वेतन आयोगाच्या अनुषंगाने निवृत्तीवेतन/ कुटुंब निवृत्ती वेतनाबाबत येणा-या तक्रारीचे अनुषंगाने येणा-या तक्रारीचे निवारण करण्यासाठी समन्वय अधिका-यांची नियुक्ती करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**

सार्वजनिक बांधकाम विभाग,
शासन परिपत्रक क्र. इएसटी १२११ /प्र.क्र. ८९/प्रशा २
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २३ मार्च, २०११.

संदर्भ : वित्त विभागाचे परिपत्रक क्र. सेनिवे १०१०/प्र.क्र १६/ सेवा ४, दि. ०२/०२/२०११.

**परिपत्रक**

राज्यातील निवृत्त वेतन धारकांच्या निवृत्तीवेतनात सहाव्या वेतन आयोगाच्या अनुषंगाने सुधारणा करण्याचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. या आदेशाच्या तसेच निवृत्ती वेतनधारकांना येणा-या अडचणी/मिळणारे लाभ इत्यादीची माहिती मिळण्याकरिता तसेच पाचव्या वेतन आयोगाच्या अनुषगांने निवृत्ती वेतन धारक/ कुटुंब निवृत्तीवेतन धारकाच्या निवृत्ती वेतनात/ कुटुंब निवृत्ती वेतनात अद्यापही सुधारणा न झाल्याच्या तक्रारी संदर्भात निवृत्ती वेतन धारक सतत शासनाकडे पत्रव्यवहाराव्दारे/समक्ष भेटून/दूरध्वनी वरुन संपर्क साधत आहेत. त्याअनुषंगाने याबाबतची माहिती निवृत्तीवेतन धारकांना ठेवून त्यांच्या अडचणी दूर करण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागातील आस्थापना विषयक कामकाज हाताळणारे श्री. भि.य.मंता, अवर सचिव (आस्थापना) यांची समन्वय अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे. या विभागाशी संबंधित सर्व निवृत्ती वेतन धारक/ कुटुंब निवृत्तीवेतन धारक यांनी त्यांच्या तक्रारी संदर्भात श्री. भि.य.मंता, अवर सचिव (आस्थापना) यांचेकडे संपर्क साधावा. त्यांचा दूरध्वनी क्रमांक व मंत्रालयातील दालन क्रमांक यांची माहिती खालीलप्रमाणे आहे :-

श्री. भि. य. मंता, अवर सचिव (आस्थापना)
सार्वजनिक बांधकाम विभाग, दालन क्रमांक २५१ (विस्तार),मंत्रालय,मुंबई, पिन ४०० ०३२.
दूरध्वनी क्रमांक २२७९ ३५५४ / २२०२९८२४

२.   सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आले असून त्यांचा संगणक संकेतांक २०११०३२३१२१९२१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(द.रा.कहार)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना शाखा)
वित्त विभाग (सेवा ४) मंत्रालय, मुंबई.
सर्व सह सचिव/ उप सचिव/ अवर सचिव / कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
श्री. भि. य. मंता, अवर सचिव(आस्थापना), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव (रस्ते)/सचिव (बांधकाम) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
सहायक प्रभारी नोंदणी शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
कार्याध्यक्ष, महाराष्ट्र पेन्शनर्स असोसिएशन, १४४९, सदाशिव पेठ, संकल्प खजिना महल बोळ, एस.पी.कॉलेज समोर, पुणे ४११ ०३०.